**केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा (प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण व शिक्षक शिक्षण) उपयोजनेचा उर्वरित निधी वितरीत करणेबाबत. (राज्य हिस्सा).**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- समग्र २०२३/प्र.क्र. २६१/ एसडी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक: २४ एप्रिल २०२४.

**वाचा :-**

१) केंद्र शासनाचे आदेश, F. No ७-२ /२०२३- IS १(GEN),(SC) and ( ST) दिनांक २२.३.२०२४
२) वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेचा दि. २६.३.२०२४ रोजीचा ई मेल
३) वित्त विभागाचे क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३, दि. ०८.१२.२०२३ व दि.०४.०३.२०२४ रोजीचे परिपत्रक.
४) शासन निर्णय समक्रमांक, दि. २६.०३.२०२४.
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र. पुर्नवि २८२३/प्र.क्र. १०२/अर्थसंकल्प, दि.३१.३.२०२४
६) शासन निर्णय समक्रमांक, दि. ३१.०३.२०२४.
७) वित्त विभागाचे दि.०१.०४.२०२४ रोजीचे परिपत्रक.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने समग्र शिक्षा योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता चौथ्या हप्त्याचा केंद्र हिस्सा (६०% नुसार) रू. ७३,१४,१०,०००/- इतका निधी उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील आदेशान्वये वितरीत केला आहे. त्यास समरूप राज्य हिस्सा (४०% नुसार) रु.४८,७६,०६,६६७/- इतका निधी वितरीत करणे आवश्यक आहे. मात्र " मागणी क्र. ई-२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (२२०२ आय ६१२ ), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली मार्च २०२४ अखेर एकूण रू.११,८३,९५,२६१/- इतका निधी शिल्लक असल्याने सदर निधी संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तदनंतर संदर्भ क्र. ६ येथील दि. ३१.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रक्कम रु. ४.०० कोटी इतका निधी पुनर्विनियोजनाने उपलब्ध करून देण्यात आलेला आहे. तथापि, सदर योजनेअंतर्गत वितरीत करण्यात आलेला केंद्र हिस्साच्या (६० %) प्रमाणात राज्य हिस्सा (४० %) प्रमाणे रु.४८,७६,०६,६६७/- पैकी अवितरीत रु.३२,९२,११,४०६/- इतका निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानातून केंद्र शासनाने उपरोक्त प्रमाणे समग्र शिक्षा योजनेसाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीच्या प्रमाणात राज्य हिस्स्याची कमी वितरीत करण्यात आलेली रक्कम रु. ३२,९२,११,४०६/- इतका निधी “मागणी क्र. ई-२, सर्वसाधारण शिक्षण, ०१

प्राथमिक शिक्षण, १०६ शिक्षक व इतर सेवा, (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) ( २२०२ आय ६१२ ), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नी रोड, मुंबई यांचेकडे समग्र शिक्षा योजनेच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये सुपुर्द करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्र.७ येथील दि. ०१.०४.२०२४ च्या परिपत्रकामधील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव/ कक्ष अधिकारी (रोख/लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह/उप सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी निधी कोषागारातून आहरित करुन निधी समग्र शिक्षा यांच्या बँक खात्यात जमा करावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.०१.०४.२०२४ चे परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदरचे अनुदान सशर्त अनुदान असून यापूर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे. या अनुदानाच्या अटी व शर्ती सदर शासन निर्णयात नमूद केल्या आहेत.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधिन दि.०१.०४.२०२४ चे परिपत्रक व नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १९८/१४७१, दि. ०८.०४.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ५३१/व्यय-०५, दि.१९.०४.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०४२४१५५३५२५४२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e89181186 34069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B 9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.04.24 16:06:01 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई
६. मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य विधानमंडळ सचिवालय मुंबई

७. प्रधान सचिव, (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१०. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
११. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
१३. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-६३
१४. सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१६. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१८. अवर सचिव/कक्ष अधिकारी, लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१९ . अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय , मुंबई.
२०. निवड नस्ती (एसडी-१).